एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता आर्थिक वर्ष सन २०२१-२२ साठी यशदा, पुणे या संस्थेस अनुदान वितरित करण्याबाबत (वेतनेतर)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. टिआरएन-२०२१/प्र.क्र.०९/सीपीटीपी-अ**
मंत्रालय, मुंबई
दिनांक- १६/०२/२०२२

वाचा :-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४ /१३/१२-अ, दिनांक २०/०१/२०१४
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६/०४/२०२१, दिनांक १४/१०/२०२१
३) यशदा, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्रमांक.सीपीटीपी प्रशा/१०९०, दिनांक ०६/१२/२०२१

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्ती होणाऱ्या गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत असून प्रशिक्षणासाठी प्रति दिन प्रति प्रशिक्षणार्थी उपलब्ध करुन दयावयाचा निधी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक ०८/०८/२०१४ अन्वये निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-५ व ६ या तुकडीच्या प्रशिक्षणासाठी पुनर्विलोकन व उजळणी प्रशिक्षणासाठी सन २०२१-२२ या अर्थसंकल्पीय वर्षात यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) या संस्थेस आवश्यक असलेला निधी रु. ५०,०५,०००/-(रुपये पन्नास लाख पाच हजार फक्त) वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत सीपीटीपी ५ व ६ या तुकडीचे पुनर्विलोकन व उजळणी टप्प्याचे प्रशिक्षण कोविड-१९ मुळे उद्भवलेल्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर अनिवासी ऑनलाईन स्वरुपात व परीक्षा ऑफलाईन याप्रमाणे आयोजित करण्यात आले होते. कोविड-१९ च्या अनुषंगाने DoPT office memorandum दिनांक ०७/१०/२०२० मधील तरतूदींच्या अन्वये ऑनलाईन प्रशिक्षणाचा दर प्रति दिन/ प्रति प्रशिक्षणार्थी रु. १५००/- असा निश्चित करण्यात आला आहे. त्यामुळे सीपीटीपी-५ व ६ मधील गट-अ च्या १४३ प्रशिक्षणार्थ्यांसाठी १४ दिवसांच्या प्रशिक्षणाचा खर्च रुपये-५०,०५,०००/-(रुपये पन्नास लाख पाच हजार फक्त) इतक्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याबाबत यशदा, पुणे यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये मागणी केली आहे.

त्यानुसार सदर शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेस "लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(१२) यशदा, पुणे या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८७१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात रुपये ५०,०५,०००/-(रुपये पन्नास लाख पाच हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन

राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) पुणे या संस्थेने खर्च वितरित अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकीच देयके कोषागारातून आहरित करण्याची दक्षता घ्यावी.

आ) प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरित केल्यानंतर आहरित केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने वितरित करण्यात आलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर व शासनाला सादर करावे.

उ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर यांना राहतील व त्याकरिता यशदा, पुणे त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

ऊ) वित्त विभाग, शासन परिपत्रक, दिनांक ०६/०४/२०२१ आणि शासन निर्णय, दिनांक २४/०६/२०२१, दिनांक २९/०७/२०२१, दिनांक ३०/०७/२०२१ व दिनांक १४/१०/२०२१ मधील नमूद अटी/ शर्तीचे पालन करुन सदर निधी खर्च करण्यात यावा.

१. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी संस्थेस वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम **रुपये ५०,०५,०००/- (रुपये पन्नास लाख पाच हजार फक्त)** आहरित करावी.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.१३/२०२२/व्यय-४, दिनांक १७/०१/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२२०२१६१२१०४३१८०७** असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gupte Sanju
Kamlakar

Digitally signed by Gupte Sanju Kamlakar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2834863d93dd5ba34736e8845b6287c3dd58ee176cf2b893df4e169e70699c59, serialNumber=4c10e808fe85223e03be4cad0148cef9a71914878680c586fc438e7239dafca4, cn=Gupte Sanju Kamlakar
Date: 2022.02.16 15:47:35 +05'30'

**(संजू गुप्ते)**
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे

४. लेखाधिकारी, यशदा, पुणे (३ जादा प्रतीसह)
५. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई
६. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
७. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मुंबई-३२
९. निवडनस्ती